**महात्मा ज्योतिबा फुले जन आरोग्य योजनेसाठी सन २०१९-२० या आर्थिक वर्षातील २२१० जी २५१ (सर्वसाधारण) या लेखाशिर्षाखालील निधी वितरीत करणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
## शासन निर्णय क्रमांकः मफुयो-२०२०/प्र.क्र. ५९/आरोग्य-६

गो.ते. रुग्णालय आवार, १० मजला,
नवीन मंत्रालय, मुंबई - ४०० ००१
दिनांक: ३० मार्च, २०२०

वाचा :-

१) सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्र. रास्वयो-२०१८/प्र.क्र.७४/आरोग्य-६, दिनांक २१ सप्टेंबर, २०१८.
२) सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्र. रास्वयो-२०१८/प्र.क्र.७४/आरोग्य-६, दिनांक २६ फेब्रुवारी, २०१९.
३) वित्त विभाग शासन परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०१९/प्र.क्र.४४/अर्थ-३ दिनांक ०१ एप्रिल, २०१९.
४) सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्र. मफुयो-२०१८/प्र.क्र.३०३/आरोग्य-६, दिनांक ०३ जुलै, २०१९.
५) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांकः अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३, दि. ०८ जुलै, २०१९.
६) सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्र. मफुयो-२०१९/प्र.क्र.१२७/आरोग्य-६, दिनांक १२ जुलै, २०१९.
७) सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्र. मफुयो-२०१९/प्र.क्र.१६१/आरोग्य-६, दिनांक १६ सप्टेंबर, २०१९.
८) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३, दि.२२ जानेवारी, २०२०.
९) सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्रमांकः पुरक-२०१९/प्र.क्र.१०२/आरोग्य-६ दिनांक ०३ फेब्रुवारी, २०२०
१०) सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन पत्र क्रमांकः निविदा-२०१९/प्र.क्र.५७/आरोग्य-६ दिनांक ०५ फेब्रुवारी, २०२०
११) सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन ज्ञापन क्र अर्थसं-२०२०/प्र.क्र.७८/अर्थसंकल्प, दि.१६ मार्च, २०२०
१२) राज्य आरोग्य हमी सोसायटीचे पत्र क्र.राआहसो /लेखा /प्र.अ. /निधी वितरण /५४२६ /३४८ /२०२० दिनांक २८ फेब्रुवारी, २०२० चे पत्र.
१३) राज्य आरोग्य हमी सोसायटीचे पत्र क्र.राआहसो /लेखा /प्र.अ. /निधी वितरण /५४२६ /३६९ /२०२० दिनांक ०४ मार्च, २०२० चे पत्र.

प्रस्तावना :-

आयुष्यमान भारत-प्रधानमंत्री जन आरोग्य योजनेचे महात्मा फुले जन आरोग्य योजनेशी संलग्नीकरण करून दोन्ही योजना राज्यामध्ये राबविण्याचा निर्णय दिनांक २६.०२.२०१९ च्या शासन निर्णयान्वये घेण्यात आलेला आहे. त्यानुसार विमा कंपनीची निवड विहीत कार्यपद्धतीनुसार करण्यात

आलेली असून निविदेप्रकीयेअंती L1 रू. ७९७/- प्रती कुटुंब प्रती वर्ष दर प्राप्त झालेल्या युनायटेड इंडीया इन्शुरन्स कंपनी लि. यांचेशी सामंजस्य करार (MoU) करण्याबाबत दिनांक ०५.०२.२०२० च्या शासन पत्रान्वये कार्यादेश राज्य आरोग्य हमी सोसायटीस देण्यात आलेले आहेत. त्याअनुषंगाने राज्य आरोग्य हमी सोसायटीकडून आवश्यकतो करारनामा व अनुषंगीक कार्यवाही करण्यात आलेली असून संदर्भ क्रमांक १२ व १३ च्या पत्रान्वये शासनास निधी वितरणाबाबत विनंती करण्यात आलेली आहे. महात्मा ज्योतिबा फुले जन आरोग्य योजनेच्या अंमलबजावणीसाठी सन २०१९-२० या वित्तीय वर्षासाठी २२१० जी २५१ (सर्वसाधारण), ३१ सहायक अनुदाने (वेतनेत्तर) या लेखाशिर्षाखाली सुधारीत अंदाजानुसार रू. ७१७.५७ कोटी इतका निधी अर्थसंकल्पित करण्यात आलेला आहे. सदर निधीपैकी संदर्भ ७ व ९ येथील शासन निर्णयान्वये रू. ३७१.१० कोटी इतका निधी राज्य आरोग्य हमी सोसायटीस वितरीत करण्यात आला आहे. महात्मा ज्योतिबा फुले जन आरोग्य योजनेच्या लाभार्थ्यांसाठी दिनांक ०१ एप्रिल, २०२० ते दिनांक ३० जून, २०२० या कालावधीतील विमा हप्ता विमा कंपनीस अदा करणे, तसेच योजनेवरील अन्य प्रशासकीय खर्च भागविणे यासाठी २२१० जी २५१ (सर्वसाधारण), ३१ सहायक अनुदाने (वेतनेत्तर) या लेखाशिर्षाखालील निधी राज्य आरोग्य हमी सोसायटीस वितरित करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

## शासन निर्णय:-

महात्मा ज्योतिबा फुले जन आरोग्य योजनेची अंमलबजावणी राज्य आरोग्य हमी सोसायटीमार्फत होत असल्यामुळे योजनेंतर्गत दिनांक ०१ एप्रिल, २०२० ते दिनांक ३० जून, २०२० या कालावधीतील लाभार्थी कुटुंबाचा विमाहप्ता अदा करणे तसेच योजनेवरील अन्य प्रशासकीय खर्च भागविणे यासाठी सन २०१९-२० या आर्थिक वर्षासाठी खाली दर्शविलेल्या लेखाशिर्षांतर्गत अर्थसंकल्पीत केलेल्या तरतूदीतून रुपये २४५,११,२६,०४५/- (अक्षरी रूपये दोनशे पंचेचाळीस कोटी अकरा लक्ष सव्वीस हजार पंचेचाळीस फक्त) एवढा सशर्त निधी राज्य आरोग्य हमी सोसायटीच्या खात्यावर तात्काळ वर्ग करण्यासाठी नियंत्रक अधिकाऱ्याकडे सुपुर्द करण्यात येत आहे. सदर रक्कमेचा धनादेश राज्य आरोग्य हमी सोसायटीच्या नावे काढण्यात यावा.

**मागणी क्र. आर-१**
२२१०- वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य
(०१) नागरी आरोग्य सेवा- विषमचिकित्सा
११० - रुग्णालये व दवाखाने
(०६) - पंचवार्षिक योजनांतर्गत योजना
(०६) (३४)- महात्मा ज्योतिबा फुले जन आरोग्य योजना(सर्वसाधारण) (राज्य योजना)
२२१० जी २५१ (दत्तमत), ३१ -सहाय्यक अनुदाने (वेतनेतर)

२. सदर निधी सोसायटीकडे वर्ग करण्यास अनुदानाचे देयक अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई यांच्याकडे सादर करण्यासाठी प्रशासकीय अधिकारी, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई हे आहरण व संवितरण अधिकारी तसेच सहसंचालक (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई हे नियंत्रक अधिकारी असतील.

३. वित्त विभागाच्या दिनांक ०८.०७.२०१९ च्या शासन परिपत्रकान्वये दिलेल्या सुचनांचे सर्व संबंधितानी काटेकोरपणे पालन करावे. तसेच प्रमाणित करण्यात येते की, सदर परिपत्रकासोबतच्या परिशिष्टातील अ.क्र.९ मधील नमुद अटींची पुर्तता झाली आहे.

४. सदर शासन निर्णय नियोजन विभाग अनौ. संदर्भ क्र. ५६/२०/१४७२ दिनांक २०.०३.२०२० व वित्त विभाग अनौ. संदर्भ क्र.१५४/व्यय-१३, दिनांक २७.०३.२०२० अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००३३०११२३३८९६१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Subhash Nivruti Gadge

Digitally signed by Subhash Nivruti Gadge
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=b1f74930407346db2703eca69fb25a73a3ba8647d94e4c83579e877eeaa6372e, cn=Subhash Nivruti Gadge
Date: 2020.03.30 18:31:51 +05'30'

**(सु.नि.गाडगे)**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. महालेखापाल, लेखा परीक्षा/ लेखा व अनुज्ञेयता, मुंबई.
२. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
३. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
४. आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई
५. मुख्य कार्यकारी अधिकारी, राज्य आरोग्य हमी सोसायटी, मुंबई
६. संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई
७. सहसंचालक, (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा संचालनालय, पुणे.
८. प्रशासकीय अधिकारी, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई. (३प्रती)
९. नियोजन विभाग (कार्यासन १४७२), मंत्रालय, मुंबई
१०. वित्त विभाग, कार्यासन - व्यय -१३/अर्थसंकल्प-९, मंत्रालय, मुंबई-३२.
११. अर्थसंकल्प शाखा, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. निवड नस्ती.